**क्षणा)साठीं त्याला (नक्षत्रांनीं) सुशोभित केलें. १६. आणि धोंड-**
**मारानें पिटाळलेल्या अशा प्रत्येक सैतानापासून आम्हीं त्याचें संरक्षण**
**केलें, (कीं तेथें सैतानांपैकीं कोणीच जाऊं शकत नाहीं.) १७.**
**पण चोरी छपीनें जो कोणी (कांहीं) ऐकून पळेल, तर (नक्षत्रांचा) प्रत्यक्ष**
**लालभडक अंगारा (त्याच्या खिद्‌डण्यासाठीं) त्याच्या पाठीस लागतो. १८.**
**आणि आम्हीं पृथ्वीला विस्तीर्ण केलें (कीं तींत मनुष्य व इतर प्राणी वसा-**
**वेत) आणि आम्हीं तींत (मेखाप्रमाणें भारी) अचल पर्वत रोंवून टाकिले**

---

आणि प्रत्येक भागाच्या तारकापुंजास एकत्र जुळवून त्यांची एक आकृति ठरविली आहे व त्याच आकृतीचें नांव त्या राशीस दिलें आहे; उदाहरणार्थ सिंहरास, मीनरास, तुलारास, वगैरे. नक्षत्रें परमेश्वरानें बनविलेलीं असून तीं अशा तऱ्हेनें ग्रथित झालीं आहेत कीं जेणेंकरून लोकांस राशींची विभागणी करणें व त्यांस नांव देणें ह्यांची संधि साधली; म्हणूनच परमेश्वरानें राशी बनविणें हें आपल्याकडे लाविलें आहे.

(१) लालभडक अंगारा म्हणजे उल्कापात जो रात्रीच्यासमयीं दृष्टीस पडतो तो. सृष्टिव्यवस्थेची घटना अशी झाली आहे कीं देवदुतांस परमेश्वराकडून सृष्टि व्यवस्थेचे हुकूम मिळतात व दुतांत त्यांसंबंधानें चर्चा होऊं लागतात. पैगंबर साहेबांच्यापूर्वी सैतान वा असुर हे आकाशावर जाऊन दुतांचें संभाषण ऐकून येत होते; आणि जगांत जे लोक ‘काहिन’ म्हणजे भविष्य सांगणारे होते त्यांचा उद्योगच हा असे. ते सैतानापासून ऐकून अगर आपल्यापरी नसत्या कल्पना रचून लोकांस बहकवून टाकीत होते. पैगंबर साहेबांच्या काळापासून सैतानांचें आकाशापर्यंत जाणें बंद झालें. तथापि ते केव्हां केव्हां वर जाऊन ऐकण्याचे प्रयत्न करतात; पण उल्कापात होऊन ते खालीं परतविले जातात. या गोष्टी आमच्या समज शक्तीचे बाहेर आहेत, तरी अद्भुत विश्व-च्छक्ति व पृथ्वीची आकर्षणशक्ति ह्यांचीं कारणें जशीं आम्हांस माहीत नाहींत त्याच कोटींतील ह्याहि गोष्टी असाव्यात. पण हे चमत्कार पाहून एकदम या गोष्टीवर विश्वास ठेवण्यास हरकत नाहीं.

(२) आधुनिक शास्त्रीय शोधानें ही गोष्ट निश्चित ठरविली आहे कीं पृथ्वी गोलाकार आहे व ती चक्राप्रमाणें नित्य फिरत असून सूर्या-

(कीं पृथ्वी एका विशिष्ट आकारांतच रहावी.) आणि आम्हीं तींत
(योग्य त्या) अंदाजाची हरेक चीज उगविली. १९. आणि (या
व्यतिरिक्त) आम्हींच पृथ्वींत तुम्हां लोकांच्या उपजिविकेचीं साधनें
तयार केलीं, आणि (केवळ तुमचींच नव्हे तर) ज्यांना तुम्हीं भक्ष्य
देत नाहीं (किंबहुना आम्हींच देतों,) अशा(इतर प्राण्यांच्या उप-
जिविके)चींहि. २० आणि जितक्या म्हणून वस्तु होत, आम्हां-
पाशीं त्या सर्वांचीं (भंडारेंचीं) भंडारें (भरपूर पडलीं) आहेत.
आणि आम्हीं एका नियमित अंदाजानें (सृष्टीचे उपयोगासाठीं)
त्या पाठवित असतों. २१. आणि वायु जे पाण्यानें परिपुष्ट अशा
आभाळास उभारतात त्यांस आम्हींच पाठवितों; मग आम्हींच
आकाशांतून पाणी वर्षवितों व मग आम्हींच तें (पाणी) तुम्हां
लोकांस पाजतों; आणि तुम्हीं लोकांनीं तर तें संचय करून ठेविलें
नव्हतें. (कीं आम्हीं तेंच वर्षविलें असेल!) २२. आणि आम्हींच
(लोकांस) जगवितों व आम्हींच (त्यांना) मारतों; आणि (सर्वांच्या
मरणापश्चात) आम्हींच (समस्त मालमत्तेचे) वारस होऊं २३.
आणि तुमच्यांतून जे लोक पूर्वी होऊन गेले आहेत त्यांनाहि आम्हीं
जाणतों व जे (तुमच्या) मागून येणार आहेत त्यांनाहि आम्हीं
जाणतों. २४. आणि (हे पैगंबरा!) कांहीं संशय नाहीं कीं तुझा
पालनकर्ताच (पुनरुत्थानाचे दिवशीं) या(सर्वां)स (आपल्या हुजुरांत)
गोळा करील. निःसंशय, तो बुद्धिमान् (व सर्व गोष्टींशीं) वाकब
होय. २५. आणि आम्हींच, काळ्या मातीचा घाणलेला गारा, जो

भोंवतीं प्रदक्षिणा करते. तें कांहींहि असो, पण यानें पृथ्वी विस्तीर्ण आहे
यास कांहीं बाध येत नाहीं. पृथ्वी गोलाकार अगर चपटी अथवा स्थिर अगर
अस्थिर, कांहीं असो, त्याचा इस्लामधर्मशास्त्रांत कांहींच उल्लेख नाहीं. तथापि
यांत ईश्वराचें परमसामर्थ्य मात्र स्पष्ट दिसून येतें. आतां राहिला हा विचार कीं
पृथ्वी गोल आहे व तिला दुहेरी गति आहे; आणि तिच्या उत्तर ध्रुवाकडील टोंक
कांहींसें वरती निघालेलें आहे; तर पृथ्वीला हा विशिष्ट आकार पर्वतांच्याच
ओझ्यानें प्राप्त झाला आहे. आणि दक्षिण ध्रुवाकडे जास्त ओझें पडलें म्हणून
ती बाजू कांहीं कललेली आहे हीहि ईश्वरी लीलाच होय.

(सुकून) खणखणां बोलूं लागतो त्यांतून 'आदम'ला निर्माण केलें. २६. आणि आम्हीं जिन्नां(च्या कुलपति)स (मनुष्याच्याहि)पूर्वी सूक्ष्म अग्नींतून निर्माण करून चुकलों होतों. २७. आणि (हे पैगंबरा! तो वेळ आठवण कर कीं) जेव्हां तुझ्या पालनकर्त्यानें दुतांस सांगितलें कीं मीं काळ्या मातीचा कुजलेला गारा जो (सुकून) खणखणां बोलूं लागतो त्यांतून एक मनुष्य निर्माण करणार आहें. २८. तर जेव्हां मी त्याला पूर्णपणें बनवून चुकेन व त्यांत आपला (स्वनिर्मित) आत्मा फुंकेन, तेव्हां तुम्हीं त्याच्यापुढें साष्टांग नमस्कार घालीत (भराभर पालथे) पडा. २९. सारांश, दरोबस्त साऱ्याचे साऱ्या दुतांनीं ('आदम'चे पुढें) साष्टांग नमस्कार घातला. ३०. परंतु 'इबलीस' यानें साष्टांग नमस्कार घालणारांबरोबर सामील होण्याचें नाकारिलें. ३१. (यावर परमेश्वरानें) म्हटलें कीं हे 'इबलीसा'! तुला काय (कारण) घडलें कीं तूं साष्टांग नमस्कार घालणारांत सामील होत नाहींस. ३२. तो बोलला, मीं असा नव्हे कीं ज्या मनुष्यास तूं, काळ्या मातीचा कुजलेला गारा जो (सुकून) खणखणां बोलूं लागतो त्यांतून निर्माण केलेंस त्याला मीं साष्टांग नमस्कार घालीन. ३३. (परमेश्वरानें) सांगितलें (कीं साष्टांग नमस्कार घालीत नाहींस) तर तूं या(स्वर्गा)तून निघ; कारण, तूं धोंडमार करून पिटाळला जाशील. ३४. आणि निर्णयाच्या दिवसापर्यंत तुजवर शाप(-वृष्टि) होईल. ३५. (सैतान) म्हणाला कीं हे माझ्या पालनकर्त्या! (असो,) ज्या दिवशीं (मनुष्यें पुनरुत्थानांत पुन्हां) उठवून उभे केले जातील त्या दिवसापर्यंतचा तूं मला आवकाश दे. ३६. (परमेश्वरानें) म्हटलें कीं (बरें,) तूं अवकाश दिलेल्यापैकीं आहेस. ३७. (व तोही एका) नियमित काळाच्या (म्हणजे पुनरुत्थानाच्या) दिवसापर्यंतचाच. ३८. (सैतान) म्हणाला हे माझ्या पालनकर्त्या! तूं जशी (मानवाखातर) माझी वाट मारलीस, (तसेंच) मीहि पृथ्वींत त्यांना (संसाराचें) उत्तम चित्र दाखवून या सर्वांस बहकवीन तरच सई. ३९. परंतु यांच्यातून तुझे निस्सीम निवडक सेवक मात्र (माझ्या बहकविण्यांत

येणार नाहींत). ४०. (परमेश्वरानें) बजाविलें कीं हाच (निस्सीम भक्तिचा) एक सरळ मार्ग होय (कीं जो) थेट मजपर्यंत (येऊन पोहोंचतो). ४१. (जे) माझे सेवक (होत), त्यांच्यावर तर तुझा कोणाही तऱ्हेचा जोरा नाहीं; पण बहकलेल्यांपैकीं जो कोणी तुझ्या नादीं लागेल (तर लागो). ४२. आणि अर्थात अशा सर्व लोकांसाठीं (आमच्या येथून शेवटचें) अभिवचन नरकाचेंच होय. ४३. त्याचीं सात द्वारें असतील; प्रत्येक द्वारां(तून दाखल होण्या)साठीं नरकवासी लोकांच्या टोळ्या विभागलेल्या असतील. ४४. (राहिले, परमेश्वराला) भिऊन चालणारे (हे त्या दिवशीं स्वर्गाच्या) बागा व झरे यांच्यामध्यें असतील. ४५. (आणि बागांत शिरतांच आमचे दूत त्यांना ह्मणतील कीं) शांति व समाधानानें तुह्मीं या(बागां)त प्रवेश करा. ४६. आणि (जगांत एकमेकांकडून) त्यांच्या मनांत कांहीं चुरस राहिली असेल तर तीहि आम्हीं काढून टाकूं; (आणि हे) एकमेकांच्या समोरासमोर (अशा प्रसन्न वदनानें) तक्तांवर (बसलेले) असतील (जणूं कीं) भाऊ भाऊच. ४७. यांना स्वर्गांत कोणाहि तऱ्हेचे कष्ट पोहोंचणार नाहींत व हे (कधीं) स्वर्गांतून काढलेहि जाणार नाहींत. ४८. (हे पैगंबरा!) माझ्या सेवकांस साफ कळवून दे कीं (एके बाजूनें) मी क्षमाकर्ता (व) दयाळू आहें; ४९. व (दुसऱ्या बाजूनें) माझी शिक्षाहि (फारच) दुःखकारक शिक्षा होय. ५०. आणि यांना 'इब्राहिमा'चे पाहुण्यांचा अहवाल ऐकीव; ५१. कीं जेव्हां ते 'इब्राहिमा'पाशीं आंत गेले, तेव्हां त्यांनीं (प्रथम) सलाम केला. 'इब्राहिमा'नें (सलामाचा जबाब देऊन) म्हटलें कीं आम्हांला तर तुम्हांपासून भीति वाटत आहे. ५२. ते बोलले, तूं (मुळींच) भीति राखूं नकोस, आम्हीं तुला एका शहाण्या सुरत्या पुत्रा(च्या जन्मण्या)ची सुवार्ता ऐकवितों. ५३. ('इब्राहिमा'नें) म्हटलें, कां तुम्हीं मला (पुत्राचे होण्याचें) शुभवर्तमान देतां? आणि एव्हां मला तर वृद्धावस्थेनें येऊन गांठिलें आहे; तर आतां कशाची सुवार्ता ऐकवितां? ५४. ते ह्मणूं लागले कीं आम्हीं तुला सत्यपूर्वक

सुवार्ता ऐकवितों; तर तूं निराश होऊं नकोस. ५५. ('इब्राहिमा'नें) ह्मटलें कीं बहकलेल्या लोकांशिवाय असा कोण आहे कीं जो आपल्या पालनकर्त्याचे दयेकडून निराश होईल? ५६. (मग 'इब्राहीम') ह्मणाला कीं हे (ईश्वरप्रेषित) दुतांनों! (बरें) मग (आतां) तुमचा काय निरोप आहे? ५७. त्यांनीं उत्तर दिलें कीं (शिक्षा ठोठावण्यासाठीं) एका पापी राष्ट्राकडे आम्हांला पाठविलें गेलें आहे. ५८. परंतु 'लूत'चें घराणें, कीं आम्हीं त्या सर्वांस अवश्य बचावून घेऊं. ५९. पण त्याची बायको कीं (जिच्या संबंधीं) आमचा पूर्व संकल्प झाला आहे कीं ती अवश्य (आपल्या लोकांत) मागें राहून जाईल. ६०. मग जेव्हां (इश्वरप्रेषित) दूत 'लूत'चे कुटुंबापाशीं आले; ६१. तेव्हां ('लूत'नें) ह्मटलें कीं तुह्मीं कांहीं अनोळखीसे लोक (दिसून येत) आहां. ६२. ते म्हणूं लागले, (नाहीं,) किंबहुना ज्या(शिक्षे)संबंधानें (तुझे देशबांधव) शंका करीत होते (कीं ती येईल अगर न येईल); आम्हीं तीच (शिक्षा) घेऊन तुजकडे आलों आहों. ६३. आणि आम्हीं (परमेश्वराचा) निर्णायक हुकूम घेऊन तुजपाशीं आलों आहों; व आम्हीं (तुला) खरेंच सांगतों. ६४. तर कांहीं रात्र राहतांच, तूं आपल्या (कुटुंबाच्या) लोकांस घेऊन (या वस्तींतून) निघून जा व तूं या (सर्वां)च्या पाठीमागें राहा; आणि तुमच्यांतून कोणी (मागें) वळून पाहूं नये व जेथें (जावयाचा) तुम्हांस हुकूम केला गेला आहे (ह्मणजे 'सिरीया' देश) त्याकडेसच (नीट तोंड करून) चालले जा. ६५. आणि आह्मीं 'लूत'कडे या गोष्टीचा निर्णायक आदेश पाठवून दिला कीं (हे जे तुझे जातभाई होत) सकाळ होतां होतां, ह्यांच्या वंशाचा समुच्छेद केला जाईल. ६६. (इकडे तर या गोष्टी होत होत्या) आणि (तिकडे) शहरचे लोक (कुवासनेनें) हर्ष मानीत (मानीत 'लूत'चे जवळ) येऊन ठेपले. ६७. ('लूत'नें त्यांना) सांगितलें कीं हे माझे पाहुणे आहेत; तर (त्यांच्या संबंधानें) तुह्मीं मला फजित करूं नका. ६८. आणि परमे-

(१) म्हणजे मी परमेश्वराकडून निराश झालों नाहीं; किंबहुना आपल्या वयाकडे पाहून मला आश्चर्य वाटतें.

श्वराचें भय बाळगा व मला ओशाळा करूं नका. ६९. ते बोलले, कां, आम्हीं तुला अलमदुनियेच्या लोकांविषयीं मनाई करून ठेविली नव्हती (कीं त्यांना येऊं देऊं नकोस)? ७०. ('लूत') म्हणाला कीं जर (असेंच) तुम्हांस करावयाचें आहे तर ह्या माझ्या मुली (हजर) आहेत (यांशीं लग्न करून घ्या). ७१. (हे पैगंबरा!) तुझ्या जिवाची शपथ, कीं हे ('लूत'चे लोक कामांध होऊन) आपल्या धुंदीतच (पडून) झोलत होते. (ते 'लूत'चें ऐकणार कसें?) ७२. सारांश, सूर्योदय होतां होतां, त्यांना एका मोठ्या (भयंकर) गर्जनेनें येऊन गांठिलें. ७३. मग आम्हीं (या वस्तीस उलटून) तिच्या वरच्या भागाला तिचा खालचा भाग करून टाकला; आणि (वरून) त्यांच्या वरतीं खंकरांच्या दगडांचा वर्षाव केला. ७४. कांहीं शंका नाहीं कीं या(वृतांतां)त (गोष्टींचें) मर्म ताडतात अशा लोकांसाठीं (ईश्वर-सामर्थ्याच्या बऱ्याच) निशाण्या होत. ७५. आणि ती (खालवर झालेली वस्ति) नेहमींच्या (दळण वळणाच्या) मार्गावर अद्यापिहि आहे. ७६. निःसंशय या(वस्तीच्या स्थित्यंतरां)त विश्वासणाऱ्यां-साठीं (ईश्वरी सामर्थ्याची मोठीच) निशाणी होय. ७७. आणि ('लूत'चे लोकांप्रमाणेंच 'मदयन'जवळील) अरण्याचे रहिवासी (म्हणजे 'शोऐब'चे लोकहि फारच) शिरजोर होते. ७८. तर त्यांच्या पासूनहि आम्हीं (आज्ञोल्लंघनाचा) बदला घेतला. आणि ('लूत'चे लोकांच्या व यांच्या) उभयतां(च्याहि वस्त्या) खुल्या राजमार्गावर (अजून

(१) जगांत जेव्हां जेव्हां कोणा तऱ्हेचा बिघाड पसरला, तेव्हां तेव्हां परमेश्वरानें त्याच्या सुधारणेसाठीं कोणी ना कोणी तरी पैगंबर पाठविला. अरण्यवासी, ज्यांचा उल्लेख या वाक्यांत आहे, ते हजरत **शोऐब** पैगंबर यांचे अनुयायी होते. यांचें मूळ शहर **मदयन** होतें. **मदयन** जवळ एक मोठें अरण्य वा वन होतें; म्हणून ते लोक **मदयन**वालेहि म्हणवितात व अरण्यवासीहि म्हणवितात. त्यांच्यांत इतरांस ईश्वरतुल्य मानणें व मूर्तीपूजा या निंद्य गोष्टींशिवाय तराजूची दांडी मारणे व कमी तोलणें यांची फारशी चाल होती. याच बिघाडाच्या सुधारणेसाठीं हजरत **शोऐब** हे पाठविले गेले होते, पण त्यांनीं हजरत **शोऐब**चें एकही ऐकिलें नाहीं व

उजाड होऊन पडल्या) आहेत. ७९. आणि (अशाच तऱ्हेनें) ‘हिज्र’चे रहिवासी (म्हणजे ‘समूद’चे लोक) यांनींहि पैगंबरांना पाखंडी म्हटलें. ८०. आणि आम्हीं त्यांना आपल्या निशाण्या दिल्या तरी देखील, ते त्यांजपासून तोंड चुकवीतच राहिले. ८१. आणि ते (भक्कमपणा व) अभय या दृष्टीनें पर्वत कोरून काढून घरें बनवीत होते. ८२. तर त्यांनाहि सकाळ होतां होतां मोठ्या (भयंकर) गर्जनेनें येऊन गांठिलें; ८३. आणि ते (आपल्या बचावांच्यां) ज्या खटपटी करीत होते त्या, त्यांच्या कांहींहि कामा आल्या नाहींत. ८४. आणि आम्हीं आकाश व पृथ्वी व जें कांहीं या उभयतांमध्यें आहे तें, हीं (सर्व, कोणा) सत्य संकल्पानेंच निर्मिलीं आहेत. आणि (पुनरुत्थानाची) घटका अवश्य येईलच येईल; तर (हे पैगंबरा! नास्तिकांच्या खोडसाळपणाची) संभावितपणेंच उपेक्षा कर. ८५. निःसंशय तुझा पालनकर्ताच (सर्वांचा) निर्माणकर्ता (व सर्वांच्या स्थितीशीं) वाकब होय. ८६. आणि (हे पैगंबरा!) आम्हीं तुला (‘सूरतुल्–फातेहा’चीं) सात महावाक्यें, कीं जीं (नमाजींत) दोनदां वांचिलीं जातात तीं दिलीं व (तसेंच) महिमाशाली कुराणहि (दिलें. तर ही सर्वांत मोठी देणगी होय). ८७. या नास्तिकांतून अनेक प्रकारच्या लोकांस आम्हीं जे (हे जगाचे क्षणिक) उपभोग देऊन ठेविले आहेत, त्यांजवर तूं आपली

आपणच धरणीकंप व भयंकर गर्जनेनें विध्वस्त होऊन गेले. लूतच्या लोकांच्या वस्त्या सदोम, गमोरा वगैरे व मदयनवाल्यांच्या वस्त्या या सर्व जवळ जवळच होत्या; आणि अरब देशाहून सीरियाकडे जातांना या सर्व खुल्या राजमार्गावर अजून उजाड पडलेल्या दिसून येतात.

(१) एका पैगंबरास न मानण्यानें सर्व पैगंबरांना पाखंडी म्हटल्यासारखें अवश्यच ठरतें. कारण, सर्वांचा अस्सल धर्म एकच असून एकाच परमेश्वरानें तो लोकांस पोहोंचता करण्यासाठीं त्यांस पाठविलें होतें; आणि आपल्या सेवकांच्या हिताहिताकडे दृष्टि देऊन धर्मशास्त्रांत फेरबदल होत राहिला आहे, म्हणून त्यास खोटें म्हणणें हें नास्तिकपणाचें द्योतक होय.

नजर दौडूं देऊं नकोस; आणि (धर्माकडून त्यांची निष्काळजी पाहून) त्यांच्या(स्थिती)बद्दल खेदहि करूं नकोस. आणि मुसलमानांशीं, (ते कसेहि गरीब असले तरी नेहमीं) नम्रतेनें वागत जा. ८८. आणि (या लोकांस) सांगून दे कीं मी तर स्पष्टपणें (तुम्हां सर्वांस ईश्वरी शिक्षेचें) भय सांगणारा आहें. ८९. (हे पैगंबरा! तुला न मानणाऱ्यांवर,) जशी आह्मीं विभागणाऱ्या (यहुद्यां)वर (शिक्षा)उतरली होती तशीच (शिक्षा उतरूं); ९०. कीं त्यांनीं (विभागून आपल्या-) कुराणा (म्हणजे त्या पुस्तका)चे तुकडे तुकडे करून टाकिले (म्हणजे त्यांनीं कित्येक हुकूम मानिले व कित्येक मानिले नाहींत). ९१. पण (हे पैगंबरा!)

---

(१) ह्मणजे त्यांच्या जगिक वैभवाचा व खुशालीचा हेवा करूं नका. तुह्मांला जें कुराण दिलें गेलें आहे ही सर्वांत मोठी देणगी होय.

(२) यांत संशय नाहीं कीं नास्तिकपणा स्वतःच एक मोठी आपत्ति होय. परंतु नास्तिक लोक तिला आपत्तिच समजत नाहींत व ह्मणूनच ते त्याविषयीं जपण्याचे प्रयत्नहि करीत नाहींत. आणि त्या नास्तिकांला समजावूं पाहाल तर ते उलटें त्याचें वाईट मानतात; तर अशा मनुष्याच्या स्थितीबद्दल खेद करणें ह्मणजे आंधळ्यापुढें रडणें व आपले डोळे गमाविणें यासारखें आहे.

(३) याचा शब्दशः अर्थ असा आहे कीं मुसलमानांसाठीं आपली बाजू झुकती कर; असा अरब लोकांचा बोलण्याचा प्रघात आहे. याचा भावार्थ नम्रता, स्वागत, मनधरणी वगैरे होतो. भाषांतरांत आह्मीं नम्रतेनें वागणें असा अर्थ घेतला आहे.

(४) मक्केचे नास्तिक कुराणाला भिन्न भिन्न नांवें ठेवीत; कोणी जादू ह्मणे, कोणी दिव्य तर्कांच्या भराऱ्या; तर कोणी, प्राचीन कथा व कोणी काव्य रचना. ह्याप्रमाणें विभागून त्यांनीं त्याचे तुकडे तुकडे करून टाकले होते. या शिवाय 'सुरतुल–बकरा:' त्याच्या वाट्यांत, 'अंकबूत' म्हणजे कोष्टी याच्या हिश्यांत, माईद: म्हणजे मिष्टान्नाचें ताट

तुझ्याच पालनकर्त्याची (म्हणजे आम्हांला आपली) शपथ आहे कीं आम्हीं या सर्वांपासून, त्यांनीं जें जें कांहीं केलें सवरलें असेल त्याचा अवश्य जाब विचारूंच विचारूं. (९२–९३). तर मग तुला जो हुकूम दिला गेला आहे तो पूर्णपणें फोडून सांग; आणि मूर्तीपूजकांची बिलकुल पर्वा करूं नकोस. ९४. हे लोक जे (तुला) हंसतात त्यां(च्या शासना)स तुझ्यातर्फें आम्हीं पुरे आहों. ९५. (आणि) जे लोक परमेश्वरासमागमें इतर उपास्य स्थापित करतात (त्यांनाही आम्हीं पुरे आहों). तर पुढें जातां, त्यांना (हें) माहीत होऊन जाईल. ९६. आणि आम्हांस खचित ठाऊक आहे कीं (हे नास्तिक) जसजशा गोष्टी बोलतात त्यांजमुळें तुझें हृदय संकोचित होतें. ९७. तर तूं आपल्या पालनकर्त्याच्या स्तुति बरोबर (त्याचें) पवित्र्य वर्णन कर व (त्याच्यापुढें) साष्टांग नमस्कार घालणाऱ्यांपैकीं हो. ९८. आणि तूं आपल्या पालनकर्त्याच्या भक्तींत लागून अस; येथपर्यंत कीं तुला निश्चयात्मक हुकूम (ह्मणजे मृत्यु) येऊन ठेपेल. ९९.

---

त्याच्या वाटयांत वगैरे असें विनोदानें तुकडे तुकडे करून भाग पाडीत असत. अशीच स्थिति यहुदी आणि ख्रिस्ती लोकांची होती व अजूनही आहे कीं ते आपल्या पवित्र शास्त्राचे कित्येक भाग मान्य करतात व कित्येक नाकारितात.

(१) या वाक्यांत परमेश्वरानें एक भविष्य सांगितलें आहे. तें असें कीं कुरेशी जातीचीं पांच वडीं वडीं मनुष्यें नेहमीं पैगंबर साहेबांचा छल व उपहास करीत असत. शेवटीं पवित्र आत्मा जिब्रिल यांनीं ईश्वराज्ञेनें पैगंबराची कड उचलून घेऊन त्यांच्याकडे कांहीं खुणा केल्या; तों थोड्याच काळांत ते सर्व एका मागून एक असे अद्भुत रीतीनें आपल्या शिक्षेस पोहोंचले; व हें भविष्य पूर्ण झालें.

(२) कुराणांत निश्चय वा निश्चयात्मक हुकूम अशा अर्थाचा शब्द आहे; पण पैगंबर साहेबांच्या वचनसंग्रहां(ह्मणजे हदीस)मध्यें त्याचा अर्थ मृत्यु असा आहे. अरबांच्या भाषासरणींत मृत्युला निश्चय ह्मणतात; कारण मृत्यु येणें याहून निश्चित दुसरें कांहींच नाहीं; त्याची सर्वांस खात्री असावयाचीच.

# अध्याय १६ वा.

## सूरतु-न्नह्ल्.



हा अध्याय मक्का शहरीं प्रकट झाला. ह्यांत १२८ वाक्यें आहेत. या अध्यायाच्या मध्यभागी मधमाशांसंबंधानें परमेश्वरानें जें कांहीं उल्लेखिलें आहे त्यांत असें ध्वनित केलें आहे कीं परमेश्वर मधमाशी सारख्या अगदीं लहानसहान प्राण्यांनाहि स्वयंस्फूर्ति देतो व त्यायोगें त्यांजपासून मोठीं चमत्कारिक कामें घेतो. तर पैगंबरांपासून अशाप्रकारें परमेश्वरानें मनुष्यांच्या सन्मार्ग दाखविण्याचें काम घेतलें व त्यांस पैगंबरानें पद दिलें यांत कांहींच आश्चर्य नाहीं. या ईश्वरदत्त देणग्यांचीं भिस्त फारकरून मनुष्याच्या अंगच्या योग्यतेवर असते. यांत लहान, थोर, गरीबी व मातब्बरी, वगैरे गोष्टींशीं कांहींच कर्तव्य नसतें. म्हणून सूरत-न्नह्ल म्हणजे मधमाशीचें प्रकरण हें नांव आलें.

परम दयाळू (आणि) कृपाळू परमेश्वराचें नांवानें (मी आरंभ करितों).

(हे 'मक्के'च्या नास्तिकांनों!) परमेश्वराचा हुकूम (म्हणजे पुनरुत्थानाचा दिवस) आलाच (आला); तर (विनाकारण) त्याच्या-संबंधानें घाई मचवूं नका. (हे पैगंबरा!) हे लोक ज्यांस (परमेश्वराचे) भागीदार मानतात त्यांजपासून परमेश्वर पवित्र व थोर होय. १. तोच आपल्या आज्ञेनें दुतांस आदेश देऊन, आपल्या सेवकांपैकीं ज्याच्याकडे इच्छितो त्याच्याकडे पाठ-

वितो; कीं (लोकांस) दरदरावून सांगा कीं माझ्याशिवाय अन्य कोणी उपास्य नाहीं; ह्मणून तुह्मीं मला भीत रहा. २. त्यानेंच (कोणा मोठ्या) सत्य संकल्पानें आकाश व पृथ्वी हीं निर्मिलीं. तर हे लोक ज्यांस (परमेश्वराचे) सरकतदार मानतात त्यांहूनहि तो (फारच) थोर होय. ३. त्यानेंच माणसाला एका वीर्यबिंदूतून उत्पन्न केलें; असें असतांहि (पुनरुत्थानाविषयीं) तो एकदम धडधडीत वाद घालूं लागला. ४. आणि त्यानेंच चतुष्पाद जनावरेंहि पैदा केलीं; त्यां(चीं कातडीं व लोंकर यां)त तुम्हां लोकांच्या (थंडी वाऱ्याच्या) निवारणाचीं साधनें होत आणि (इतरहि अनेक तऱ्हेचे) फायदे होत; व त्यांतून (कित्येकांस) तुह्मीं खातांहि. ५. आणि जेव्हां संध्याकाळीं तुह्मीं (त्यांस चारून) घरीं परत आणितां व जेव्हां सकाळीं (रानांत) चारणीस घेऊन जातां, तेव्हां त्यांत तुम्हांसाठीं एक भूषणहि होय. ६. आणि ज्या शहरापर्यंत तुम्हीं स्वतः जिवाला झीज सोसल्यावांचून पोहोंचूं शकत नाहींत त्या(शहरा) पर्यंत हीं(जनावरें) तुमचीं ओझींहि वाहून नेतात. कांहीं संशय नाहीं कीं तुमचा पालनकर्ता (तुम्हांवर) फारच करुणाशील (व)दयाळू होय. ७. आणि (त्यानेंच) घोडे व खेचरें व गाढवें हीं (पैदा केलीं) कीं तुह्मीं त्यांजपासून स्वारीचें काम घ्यावें; व (स्वारी शिवाय हीं सर्व) भूषण-(प्रदहि होत). आणि तोच तुह्मीं जाणत नाहींत अशा (आणखी अनेक चिजा) पैदा करितो. ८. आणि (धर्माचे मार्ग दोन प्रकारचे होत; एक नियत) सरळ मार्ग (जो थेट) परमेश्वरापावेतों (पोहों-

(१) हें वाक्य खलफचा मुलगा उबय याच्या संबंधानें प्रकट झालें आहे. यानें एकदां पैगंबर साहेबांपुढें एक कुजलेलें हाडूक आणून म्हटलें कीं याला कोण फिरून जिवंत करील कीं जेणेकरून पुनरुत्थान होईल. यावर परमेश्वरानें बजाविलें कीं तूं आपल्या मूळ उत्पत्तीकडे पहा कीं एका अपवित्र व गलिच्छ अशा वीर्य बिंदूतून तुझें उत्पादन झालें आहे. तर लहान्या तोंडीं मोठा घांस घेऊन पुनरुत्थान व परमेश्वरी सामर्थ्य यांच्या विषयीं वाद घालतोस काय? ज्यानें तुला अशा क्षुल्लक बिंदूंतून बनविलें तो पुनरुत्थानांत तुला फिरून जिवंत करून उठवूं शकणार नाहीं?

चतो) आहे; आणि इतर कित्येक वेडे वांकडे. आणि जर परमेश्वर इच्छिता तर तो तुह्मां सर्वांस सरळच मार्ग दाखवून देता. ९. तोच असा (परम समर्थ) होय कीं ज्यानें आकाशांतून पाणी वर्षविलें; कीं ज्यांतून कांहीं तुमच्या पिण्याचें होय आणि (कांहीं असें होय कीं) ज्यायोगें वृक्ष (पालनपोषण पावत) आहेत; कीं ते तुह्मीं (आपल्या गुरांढोरांना) चारतां. १०. त्याच पाण्यानें परमेश्वर तुह्मांसाठीं शेत व जीत–वृक्ष ( Olive tree ) व खजुरी व द्राक्षें आणि हरेक तऱ्हेचीं फळें निपजवितो. निःसंशय जे लोक विचारानें काम घेतात त्यांच्यासाठीं ह्यांत (ईश्वरी सामर्थ्याची) एक (मोठीच) निशाणी होय. ११. आणि त्यानेंच रात्र व दिवस आणि सूर्य व चंद्र यांस (एका दृष्टीनें) तुमच्या ताब्यांत करून ठेविलें आहे; आणि (अशाच तऱ्हेनें) नक्षत्रेंहि[१] त्याच्याच आज्ञेनें (तुमच्या) आज्ञाधीन आहेत. जे लोक अक्कल राखतात त्यांच्यासाठीं ह्यांत (ईश्वरी सामर्थ्याच्या बऱ्याच) निशाण्या होत. १२. आणि (बहुतशा) चिजा, ज्या तुमच्या(उपयोगा)साठीं भूतळावर त्यानें निर्माण करून ठेविल्या आहेत; व त्यांचे निरनिराळे रंग होत; यांतही जे लोक मननपूर्वक विचार करितात त्यांच्यासाठीं (ईश्वरी सामर्थ्याची मोठीच) निशाणी (उपलब्ध) होय. १३. आणि तोच असा (परम समर्थ) होय कीं ज्यानें (एका दृष्टीनें) समुद्रांस[२] तुमच्या अंकित करून दिलें आहे; कीं त्यांतून तुह्मीं (मासे काढून त्यांचें ताजें) ताजें मांस खावें;

---

(१) रात्र, दिवस, चंद्र, सूर्य व नक्षत्रें या सर्वांस मनुष्याच्या आज्ञांकित याकरितां ह्मटलें कीं त्यांच्याद्वारें माणसांचीं मोठमोठीं कामें निवतात. तर या दृष्टीनें पाहतां हीं सर्व माणसाच्या ताब्यांत होत.

(२) समुद्र एका दृष्टीनें यासाठीं माणसाच्या अंकित आहे कीं लोक त्यांत गलबतें व जहाजें हांकारितात, मासे मारतात व त्यांतून मोत्यें, प्रवाळ, वगैरे रत्नें काढतात. शिवाय आपल्या सोई व उपयोगा करितां समुद्राचें पाणी कापून त्याचा रोंख त्यांना फिरवितांहि येतो.






व (तसेंच) त्यांतून (अलंकारिक वस्तु म्हणजे) जडजवाहीर जें तुम्हीं लोक परिधान करीत असतां तेंहि तुम्हीं काढावें. आणि (हे वाचक-श्रोत्या!) तूं गलबतांस पाहत आहेस कीं तीं (पाण्याला) फाडत फाडत समुद्रांत वाहत चाललीं जात आहेत; आणि (समुद्राला यासाठींहि तुमच्या अंकित केलें आहे) कीं तुम्हीं लोकांनीं परमेश्वराचें औदार्य (म्हणजे व्यापारविषयक लाभ) याचा शोध करावा; आणि (शेवटीं या सर्व लाभांकडे दृष्टि देऊन परमेश्वराचे) आभार मानावेत. १४. आणि (त्यानेंच भारी) अचल पर्वत पृथ्वींत रोंविले, कीं पृथ्वी तुह्मांस घेऊन (आणखी कोणींकडे) झुकूं नये; आणि (त्यानेंच) नद्या व मार्ग हीं (काढिलीं) कीं कदाचित् तुम्हीं (आपल्या) उद्दिष्ट मार्गी लागाल. १५. आणि (मुशाफिरांसाठीं आणखीही अनेक) निशाण्या (नेमून दिल्या आहेत कीं त्यांच्या योगें त्यांना मार्ग आक्रमितां यावा;) आणि लोक नक्षत्रांच्या योगेंहि मार्गास लागतात. १६. तर कां जो (परमेश्वर इतकी सृष्टि) निर्माण करतो तो, ज्या (मूर्ती कांहींच) निर्माण करूं शकत नाहींत त्यांच्या सारखाच होऊन गेला? मग कां तुह्मीं (इतकी गोष्टहि) समजत नाहीं? १७. आणि जर तुह्मीं परमेश्वराच्या देणग्या मोजूं पाहाल, तर (त्या इतक्या विपुल होत कीं तुह्मा लोकांना) त्या पुऱ्या पुऱ्या मोजतां येणार नाहींत. निःसंशय परमेश्वर क्षमाकर्ता (व) दयाळू होय; (कीं तो तुमच्या कृतघ्नतेवरहि शासन करीत नाहीं व आपल्या देणग्या तकूब करीत नाहीं.) १८. आणि जें कांहीं तुह्मीं लपवितां व जें कांहीं जाहीर करतां तें (सर्व कांहीं) परमेश्वर जाणतो. १९. आणि परमेश्वराशिवाय ज्या (मूर्तीं)स (हे लोक कर्त्या हर्त्या समजून) बोलाविनात, (त्यांची परिस्थिति ही होय कीं) त्या कोणचीच वस्तु निर्माण करूं शकत नाहींत; किंबहुना त्या खुद्द निर्मिल्या जातात. २०. (त्या) मेलेल्या होत, कीं ज्यांत जीव नाहीं. आणि त्यांना इतकेंहि कळत नाहीं कीं केव्हां (पुनरुत्थान होईल व मेलेले) उठवून उभे केले

(१) म्हणजे लोक मूर्तीस आपल्या हातांनीं घडून तयार करतात; त्या आपल्या आपणच होत नाहींत.




जातील? (मग पुनरुत्थानांत ह्या काय उपयोगी पडणार?) २१. (लोकांनो!) तुमचा उपास्य (देव) एकच परमेश्वर होय. तर जे लोक शेवट(च्या दिवसा)चा विश्वास राखीत नाहींत, त्यांचीं मनेंच (कांहीं या प्रकारचीं होत कीं कसलीही वाजवी गोष्ट असो ते) नाकारणीच करीत जातात; आणि ते (फारच) गर्विष्ट होत. २२. तथापि यांत शंकाच नाहीं कीं हे लोक जें कांहीं लपवून करतात व जें जाहीर करतात तें (सर्व कांहीं) परमेश्वर जाणतो. अर्थात् अहंकार करणारे त्याला (बिलकुलच) आवडत नाहींत. २३. आणि जेव्हां या(नास्तिकां)स (कुराणासंबंधानें) पुसलें जातें कीं तुमच्या पालनकर्त्यानें काय हो सादर केलें आहे? तेव्हां ते जबाब देतात कीं (अहो! त्या) प्राचीन लोकांच्या कथा होत. २४. (यांच्या या बोलण्याचा आवश्यक परिणाम हा होय) कीं पुनरुत्थानाचे दिवशीं आपलीं (पापांचीं) संपूर्ण ओझीं, आणि ज्या लोकांना ते बिन समजल्या उमजल्या बहकवितात त्यां(च्या पापां)चीं ओझीं (हीं अवघीं) त्यांनाच उचलावीं लागतील. पाहा! तर (कसें) वाईट ओझें हे लोक आपल्यावर लादलेच चालले जातात. २५. यांच्यापूर्वी जे लोक होऊन गेले त्यांनींहि (परमेश्वराविरुद्ध) छक्केपंजे लढविले होते, म्हणून परमेश्वरानें त्यांच्या (मनसुब्याच्या) इमारतींची मूळ पायापासूनच खबर घेतली; तर त्या (मनसुब्याच्या इमारती)चें छत (धाडदिशीं) त्यांच्याचवरती त्यांच्यावरून येऊन कोसळलें. (आणि सारे मनसुबे फसले). आणि जेथून त्यांना भास सुद्धां नव्हता तेथून शिक्षा त्यांच्या पुढें आली. २६. नंतर (यावरच पुरें झालें नाहीं, तर) पुनरुत्थानाच्या दिवशीं परमेश्वर त्यांना (आणखीहि) फजित करील व (त्यांना) विचारील कीं (तुम्हीं जे) माझे सरकतदार (स्थापून ठेविले होते व) ज्यांच्यासंबंधानें तुम्हीं (विश्वासूंशीं) भांडाभांड करीत होतां ते (आतां) कोठें आहेत? (त्यावेळीं त्यांच्यानें तर कांहीं उत्तर देववणार नाहीं; पण) ज्या लोकांस (जगांत सत्याचें) ज्ञान दिलें गेलें होतें, ते बोलूं लागतील कीं आज रोजीं फटफजिती व खराबी (ही सारी आपत्ति) नास्तिकांवरच होय; २७.






कीं (जगांतहि) हे लोक (परमेश्वराचे सरकतदार स्थापून) आपणच आपल्यावर अनर्थ करून घेत होते अशा परिस्थितींतच दुतांनीं त्यांचे प्राण हरण केले होते. तर ते (ज्यांच्याशीं जगांत भांडण करीत होते अंतकालीं त्यांच्याशीं) सलोख्याचें बोलणें चालवितील; (आणि निमित्तास ह्मणतील) कीं आह्मीं तर (आमच्या मतें) कोणाही तऱ्हेचें वाईटपण करीत नव्हतों. (यावर दूत ह्मणतील,) हो होय, (तुह्मीं वाईट केलेंत व) जें कांहीं तुह्मीं करीत होतां, परमेश्वर त्याशीं खूप वाकव होय. २८. ह्मणून 'जहन्नम'च्या दारवाज्यांतून (नरकाग्नींत) जाऊन दाखल व्हा (व) त्यांतच सर्व काल रहा. सारांश, अहंकार करणारांचेंहि (किती तरी) वाईट ठिकाण होय! २९. आणि जे लोक (परमेश्वराला) भिऊन वागतात त्यांच्याशीं (कुराणासंबंधानें) पुसलें जातें कीं तुमच्या पालनकर्त्यानें काय हो सादर केलें आहे? तर ते उत्तर देतात कीं (उत्तमांत) उत्तम. ज्या लोकांनीं सुकृत्यें केलीं त्यांचें ह्या जगांतहि कल्याण होय; आणि अर्थात (त्यांचें) पारलौकिक निवासस्थान (तर याहूनहि) उत्तम होय. आणि (परमेश्वराला) भिऊन चालणाऱ्यांचें (परलोकींचें) घर (कितीतरी) उत्कृष्ट होय! ३०. ह्मणजे (त्यांच्या) नेहमींच्या राहण्या(साठीं स्वर्गा)च्या बागा होत कीं त्यांत ते जाऊन दाखल होतील; त्या(बागांच्या)खालून पाण्याचे पाट वाहत असतील; त्यांत त्यांना जो (पदार्थ) हवासा वाटेल तो त्यांना (उपलब्ध) होईल. परमेश्वर (आपणाला) भिऊन चालणाऱ्यांस अशाच तऱ्हेनें मोबदला देतो. ३१. आणि ह्यांचे प्राण दूत अशा स्थितींत हरण करतात कीं ते (नास्तिक्याच्या अमंगलपणापासून) शुद्ध (व चोखे) असतात; (आणि जेव्हां) दूत (प्राण हरण करण्यासाठीं येतात तेव्हां अत्यादरानें ते त्यांना) तुह्मांस सलाम-शांति-अस्सो, असें ह्मणतात (व सांगतात) कीं जशीं (चांगलीं) कृत्यें तुह्मीं (जगांत) करीत राहिलां आहां, त्यांच्या ऐवजीं तुह्मीं स्वर्गांत जाऊन दाखल व्हा. ३२. (हे पैगंबरा!) कां (हे नास्तिक) याच गोष्टीची वाट पाहत आहेत कीं दूत (त्यांचे प्राण हरण करण्यासाठीं) त्यांच्या जवळ









येऊन ठेपावेत अगर तुझ्या पालनकर्त्यांचा (शिक्षेचा) हुकूम येऊन सादर व्हावा? जे लोक ह्यांच्यापूर्वी होऊन गेले आहेत त्यांनींहि असेंच केलें. आणि परमेश्वरानें त्यांच्यावर (किंचितहि) जुल्म केला नाहीं; किंबहुना ते (नास्तिकपणा पत्करून) आपणच आपणावर जुल्म करीत राहिले. ३३. परीणाम हा झाला कीं (जशीं वाईट कर्मे ते करीत होते तशींच) त्यांच्या कर्मांचीं वाईट फळें त्यांना मिळालीं; आणि ते ज्या (शिक्षे)ची टेर उडवीत, ती त्यांच्यावर येऊन पडलीच (पडली). ३४. आणि जे लोक (परमेश्वराचे) पातीदार स्थापीत करतात ते ह्मणतात कीं जर परमेश्वर इच्छिता, तर आम्हीं त्याच्याशिवाय अन्य कोणा वस्तुची पूजा न करितों व न आमचे वाडवडीलच (करते). आणि आह्मीं त्यांच्या(हुकमा) शिवाय (आपल्याकडून) कोणा वस्तूस निषिद्ध न ठरवितों. जे लोक यांच्यापूर्वी होऊन गेले आहेत त्यांनींहि असेच (बहाणे) केले. तर पैगंबरांवर (ईश्वरी हुकूम) स्पष्टपणें पोंचते करणें या शिवाय आणखी कांहींच (जिम्मा) नाहीं. ३५. आणि आह्मीं प्रत्येक जनतेंत (कोणी ना कोणी) पैगंबर (या गोष्टीच्या समजाविण्यासाठीं) पाठवीत राहिलों आहों, कीं (लोकांनों!) परमेश्वराची उपासना करा आणि आज्ञाभंजक (सैतानाच्या बहकविण्या)विषयीं जपत राहा. तर त्यांच्यांतून कित्येकांस तर परमेश्वरानें सन्मार्गी लाविलें व त्यांच्यांतून कित्येक बहकण्यास पात्र ठरले. ह्मणून (लोकांनों!) पृथ्वीवर हिंडा, फिरा आणि पहा कीं (पैगंबरांना) पाखंडी ह्मणाऱ्यांचा कसा (वाईट) परिणाम झाला! ३६. (हे पैगंबरा!) जर तुला या लोकांच्या सन्मार्गावर येऊन जाण्याचा अभिलाष असेल तर (हा विचार तूं सोडून दे; कारण कीं) परमेश्वर ज्याला कुमार्गी लावूं इच्छितो त्याला तो सन्मार्गाची बुद्धि देत नसतो. आणि अशा लोकांच्या मदतीसहि कोणी उठून उभा राहत नसतो; (कीं तो त्यांना शिक्षेंतून वांचवून घेईल.) ३७ आणि हे नास्तिक लोक परमेश्वराच्या पराकाष्टेच्या शपथा वाहतात कीं जो मरून जातो त्याला परमेश्वर (पुन्हां) उठवून उभा करणार नाहीं. (हे




पैगंबरा! यांना सांग कीं) होय! अवश्यच, (उठवून उभा करील; हें त्याचें) सत्य वचन होय (व त्याचें पुरें करणें) त्याच्यासाठीं (अनिवार्य होय). परंतु बहुतेक लोक (विश्वासपूर्वक हें) जाणित नाहींत. ३८. (मेलेल्यांचें जिवंत उठविणें) यासाठीं (आवश्यक होय) कीं ज्या गोष्टींत हे लोक (जगांत) मतभेद करीत राहिले आहेत (पुनरुत्थानाचे दिवशीं) परमेश्वर (खरी हकीकत) त्यांना जाहीर करून टाकील आणि हें कीं नास्तिकहि जाणून घेतील कीं ते आपणच लबाड होते. ३९. जेव्हां आह्मीं कोणा वस्तुचा इरादा करतों, तेव्हां आमचें म्हणणें तिच्या संबंधानें फक्त एवढेंच असतें कीं आह्मीं तिला फर्मावितों कीं हो, आणि ती होऊन जाते. (तर आम्हांस मेलेल्यांचें जिवंत करणें काय मुष्किलीचें आहे?) ४०. आणि ज्या(मुसलमानां)वर (नास्तिकांकडून) अनर्थ गुदरण्यांत आले व त्या उपरांतहि त्यांना परमेश्वराप्रीत्यर्थ स्वदेश-त्याग करणें भाग पडलें; त्यांना आम्हीं जरूर जरूर इहलोकींच चांगल्या ठिकाणीं बसवूं. आणि परलोकींचें प्रतिफल (जें त्यांना प्राप्त होणार आहे तें याहूनहि) अति मोठें होय; (हें) जर त्यांना माहीत झालें असतें तर (बरें होतें!) ४१. जे लोक (परमेश्वराचे मार्गांत मुकाट्यानें दुःख) सहन करतात व आपल्या पालनकर्त्यावर भरंवसा राखतात, ते (परलोकींच्या प्रतिफलाचा सविस्तर अहवाल जाणते, तर मनांत संकोचित झाले नसते). ४२. आणि (हे पैगंबरा!) आम्हीं तुझ्यापूर्वींहि हेच (तुझ्याच सारखे) पुरुष (पैगंबर करून) पाठविले होते कीं त्यांना आम्हीं आदेश प्रकट करीत होतों. तर (या नास्तिकांस सांग कीं) जर (ही गोष्ट) स्वतः तुह्मांला माहीत नसली, तर (या पूर्वींची दिव्य पुस्तकें) पठन पाठन करणारांस विचारून पहा. ४३. (आणि आम्हीं पैगंबर पाठविले

(१) इस्लामाचे वर्चस्वाच्या भविष्य वचनांपैकीं हेंहि एक भविष्य होय. मक्का शहर सोडून मदिनेंत आल्यावर या लोकींच परमेश्वरानें मुसलमानांस चांगल्या ठिकाणीं बसविलें व पुढें त्यांची मोठीच उन्नति व भरभराट केली. या प्रमाणें हें भविष्य पूर्ण झालें.

होते तेहि) स्पष्ट प्रमाणें व पुस्तकें यांजसहित. आणि (अशाच तऱ्हेनें) आम्हीं तुलाहि हें कुराण प्रकटिलें आहे; अशासाठीं कीं जे (हुकूम) लोकां(च्या सन्मार्ग दर्शना)र्थ त्यांजकडे पाठविले गेले आहेत ते, तूं त्यांना स्पष्ट करून सांगावेस आणि हें कीं त्यांनींहि (या गोष्टींचें) मनन करावें. ४४. तर कां जे लोक वाईट वाईट कारस्थानें रचितात ते या गोष्टीकडून अगदींच निर्भय होऊन गेले आहेत कीं परमेश्वर त्यांना जमिनींत गडप करून मारील; अगर जेथून त्यांना कळणारहि नाहीं तेथून (ईश्वरी) शिक्षा त्याच्यापुढें येऊन ठेपेल? ४५. अगर त्यांच्या चालण्याफिरण्याच्या स्थितींतच परमेश्वर त्यांना येऊन पकडील; (व असें करूं लागेल) तर (कोणाहि युक्तीनें) ते (त्याला) हरवूंहि शकणार नाहींत. ४६. अगर त्यांना (परमेश्वराच्या पकडण्याचा अंदेशा असेल व) अंदेशा होत्साताहि तो त्यांना पकडील. ह्मणून (लोकांनों!) यांत संशय नाहीं कीं तुमचा पालनकर्ता फारच करुणाशील (व) दयाळू होय. ४७. कां या लोकांनीं परमेश्वराचे सृष्टींपैकीं कोणाहि वस्तुचें अवलोकन केलें नाहीं कीं तिच्या सावल्या (कधीं) उजवीकडेस व (कधीं) डावीकडेस दोलायमान होतात; (जणूं कीं) त्या परमेश्वरापुढें साष्टांग नमस्कार घालीत आहेत व (आपला) विनय प्रदर्शित करीत आहेत. ४८. आणि जितक्या वस्तु आकाशांत व जेवढे चालते फिरते प्राणी पृथ्वींत होत ते (सर्व) परमेश्वराच्याच पुढें साष्टांग[1] नमस्कार घालतात; व (तसेंच) देवदूतहि; आणि ते (ईश्वराज्ञेपासून) अहंकार करीत नाहींत. ४९. आणि ते आपला पालनकर्ता, जो (अत्युच्च महा सिंहासनावर) त्यांच्यावरतीं[2] होय

---

(१) वस्तूंच्या साष्टांग नमस्कार घालण्याचा अर्थ हा कीं ज्या वस्तूस ज्या प्रमाणें बनविलें आहे त्याच स्थितीवर ती काईम आहे; तींत केंसभरहि फरक येऊं शकत नाहीं.

(२) परमेश्वर त्याच्या महिम्याच्या मानानें वरती आकाशाकडे आहे असें मानिलें जातें. नाहींपेक्षां, तो प्रत्येक स्थळीं आहेच. अग

त्याला (सर्वकाल) भीत राहतात; आणि (त्याच्या हुजरांतून) जो हुकूम त्यांना दिला जातो तो ते बजावितात. ५०. आणि (लोकांनों!) परमेश्वरानें फर्माविलें आहे कीं दोन दोन उपास्य (देव) ठरवूं नका; केवळ तोच (परमेश्वर) एक उपास्य होय. तर केवळ माझेंच भय बाळगून असा. ५१. आणि जें कांहीं आकाशांत व पृथ्वींत आहे तें त्याचेंच होय; व त्याचेंच आज्ञापालन (नित्य) आवश्यक होय. तर कां तुह्मीं लोक परमेश्वराशिवाय (अन्य वस्तूंस) भितां? ५२. आणि जितक्या म्हणून देणग्या तुह्मांला (प्राप्त) आहेत त्या (सर्व) परमेश्वराकडूनच होत. नंतर जेव्हां तुह्मांला कांहीं क्लेश पोहोंचतो तेव्हां तुह्मीं त्याच्याच पुढें रडारड करतां. ५३. मग जेव्हां तो तुमच्या वरून (तो) क्लेश दूर करून टाकतो, तेव्हां तात्काळ तुह्मांपैकीं कांहीं लोक आपल्या पालनकर्त्यांचे सरकतदार स्थापित करूं लागतात; ५४. अशासाठीं कीं ज्या (देणग्या) आह्मीं त्यांना दिल्या होत्या त्यांजप्रत कृतघ्नता प्रदर्शित करावी. तर (असो, इहलोकींचा दोन दिवस) सुखोपभोग घ्या; मग अखेर (पुनरुत्थानांत) तर तुह्मांस माहीत होऊनच जाईल. ५५. आणि आम्हीं जें कांहीं यांना देऊन ठेविलें आहे त्यांत, हे लोक ज्या(मूर्तींच्या मूळ हकीकती-)लाहि जाणत नाहींत, त्या (मूर्तीं)चा वाटाहि लावतात. म्हणून परमेश्वराची (म्हणजे आम्हांला आमची) शपथ; कीं जसजसें कुभांड तुह्मीं लोक रचीत राहिलां आहां, त्याची (पुनरुत्थानाचे दिवशीं) तुह्मांपासून अवश्यच विचारणा होईल. ५६. आणि हे नास्तिक लोक (दुतांस) परमेश्वराच्या मुली ठरवितात. (वाहवाह!) परमेश्वर (जो) परम पवित्र (त्याच्या साठीं मुली) आणि खुद्द आपणासाठीं, जी कांहीं आकांक्षा ते बाळगितात ती (म्हणजे मुलगे)! ५७. आणि जेव्हां यांच्यांतून एखाद्याला मुलगी(च्या जन्मण्या)चें शुभवर्तमान दिलें जाईल, तेव्हां

---

तो कोणत्या तऱ्हेनें आहे व कसा आहे हें आमच्या बुद्धीला समजण्या-सारखें नाहीं. 'अत्युच्च महा सिंहासनावर' हें जें ह्मटलें आहे त्याचा अर्थ तो आपल्या प्रतापानें सर्वव्यापी आहे; ह्मणून सर्वांत उच्चस्थानहि त्यालाच शोभतें. **कर्मणो गहना गतिः**






(दुःखामुळें) त्याचें तोंड काळें पडून जाईल, आणि तो (जिवाचा घोट घेऊन) गम खाऊन राहील. ५८. तो, ज्या (मुलीच्या जन्मण्या)चें शुभवर्तमान त्याला दिलें गेलें आहे तिचें वाईट मानून लोकांपासून (लज्जेमुळें) लपत लपत फिरेल. (आणि मनांत तर्क करील कीं या) अपमानावरहि मुलीला धरून राहावें कां तिला मातींत दडपून टाकावें? पाहा! तर (परमेश्वरासंबंधानें) या लोकांचा (कसा) वाईट अभिप्राय! ५९. वाईट (वाईट) उपमा तर जे लोक (नास्तिक असून) परलोकींचा विश्वास धरीत नाहींत त्यांसच लागू होत; आणि परमेश्वरा(च्या महिम्या)स (योग्य) तर (अत्युत्कृष्ट व) उंचांत उंच अशा उपमा होत. आणि तोच परम समर्थ (व) बुद्धिमान् होय. ६०. आणि जर परमेश्वर, लोकांस त्यांच्या आज्ञाभंगाच्या शासनांत पकडता, तर तो भूतळावर कोणाही एका चालत्या फिरत्या प्राण्यास (बाकी) न सोडता. परंतु तो एका नियमित काळा(म्हणजे मृत्यु)पर्यंत यांस अवकाश देतो आहे. मग जेव्हां त्यांचा (तो) काळ येऊन पोहोंचतो, तेव्हां ते (त्यापासून) एक घटका मागें राहूं शकत नाहींत व पुढेंहि जाऊं शकत नाहींत. ६१. आणि (हे लोक)

---

(१) हुकूम याचा अर्थ निवाडा; पण निवाडा हा एक अभिप्रायच असतो ह्मणून आह्मीं अभिप्राय असा अर्थ केला आहे. ह्मणजे मुलींचें जन्मणें त्यांस लज्जास्पद वाटत होतें; असें असूनही ते परमेश्वराच्या ठायीं मुलींची योजना करीत असत हा निवाडा फारच अयुक्तिक असा होय.

(२) परमेश्वराला मुळांत संततीची अपेक्षाच नाहीं; कारण ही अपेक्षा त्याच्या निरपेक्ष व अद्वितीय होण्यास बाधक आहे. तशांत मुली तर संततीच्या जमेस धरतां येत नाहींत; येथपर्यंत कीं लोकहि त्यांचें असणें लांछनास्पद समजतात. तर भावार्थ हा कीं अपमान तिरस्कार व अपेक्षा या जेवढ्या गोष्टी होत त्या नास्तिकांच्या स्थितीलाच योग्य व लागू आहेत. राहिला परमेश्वर, तो आपल्या महिम्यास व प्रतापास कमीपणा आणणाऱ्या गोष्टींपासून पवित्र व थोर होय.




ज्या वस्तूंस आपण स्वत: पसंत[1] करीत नाहींत त्यांची परमेश्वराच्या ठायीं योजना करतात; आणि ते आपल्या जिव्हांनीं खोट्या प्रतिज्ञाहि करीत जातात कीं (परलोकींहि) आपलें कल्याणच होय. (कल्याण तर नाहींच;) अर्थात् त्यांच्यासाठीं नरकाग्नि होय; किंबहुना हे (नरकवाश्यांचे) पुढारी[2] होत. ६२. (हे पैगंबरा!) परमेश्वराची (म्हणजे आम्हांला आपली) शपथ आहे कीं तुझ्यापूर्वींहि आम्हीं (भिन्न भिन्न) जनतांकडे पैगंबर पाठविले. सैतानानें (त्या लोकांची वाट मारली आणि) त्यांचीं (दुष्ट) कृत्यें त्यांना सुशोभित करून दाखविलीं. तर तोच (सैतान) आजचे काळीं या(नास्तिकां)चाही मित्र (बनला) आहे आणि (मरतेशेवटीं) यांना दु:खदायक शिक्षा (होणें) आहे. ६३. आणि (हे पैगंबरा!) आम्हीं तुला (हें) पुस्तक याच हेतुनें प्रकट केलें आहे कीं ज्या गोष्टींत (हे लोक आपसांत) मतभेद करीत आले आहेत, त्या तूं यांना स्पष्ट करून समजावयास. या शिवाय (हें कुराण) जे लोक विश्वास बाळगितात त्यांच्या ठायीं सद्बोध व दया(यांस कारणीभूत) होय. ६४. आणि परमेश्वरानेंच आकाशांतून पाणी पाडिलें; मग त्या(पाण्या)चे योगें जमिनीला तिच्या मेल्या (ह्मणजे पडीत झाल्या) पश्चात (नव्यानें) सजीव[3] करून टाकिलें. कांहीं संशय नाहीं कीं

(१) याचा अर्थ एक तर याच मुळीं ज्यांचा उल्लेख करून चालला येत आहे त्या असाव्यात, अगर पातीदार मानणें हाहि अर्थ कदाचित असेल; कारण मनुष्य आपल्या अधिकारांत व आपल्या दौलतींत कोणाची पाती पसंत करीत नाहीं. असें असतांही तो परमेश्वराचे सेवक व त्याच्या सृष्ट वस्तु यांस परमेश्वराच्या सरकतदार बनवितो वा त्यांजवर सचेतन धर्मारोप करितो व त्यांस ईश्वरतुल्य मानतो हें फारच निंद्य होय.

(२) याचा अर्थ नरकाग्नीवासाच्या अखेर दर्जास ते पोहोंचविले जातील म्हणजे त्यांना अतिशय कष्ट भोगावे लागतील असा आहे. या दृष्टीनें त्यांस पुढारी म्हटलें आहे.

(३) जमिनीवर जेव्हां पिकें टवटवीत होऊन हालूं लागतात व शेतकरी शेताकडे येरझाऱ्या घालूं लागतात त्या स्थितीलाच जमिनीचें सजीव होणें म्हटलें आहे.

जे लोक (गोष्ट) ऐकतात (व समजतात) त्यांच्यासाठीं अर्थातच
या(वृत्तांतां)त (ईश्वर-सामर्थ्याची एक मोठी) निशाणी होय. ६५.
आणि (लोकांनों!) तुह्मांसाठीं चतुष्पाद जनावरांतहि एक बोधपर
धडा होय; कीं त्यांच्या पोटांत जो (आलापाला भरलेला) आहे
त्यांतून (ह्मणजे) शेण व रक्त यांजमधून, आह्मीं तुह्मांस चोखें
दूध पाजतों कीं तें पिणाऱ्यांच्या गळ्याखालीं अनायासें (गटगट)
उतरतें. ६६. आणि (अशाच प्रकारें) खजुरी व द्राक्षें यांच्या
फळांतून (आह्मीं तुह्मांला त्यांचा शिरा पाजतों) कीं तुह्मीं त्यांतून
मद्यार्कें[1] बनवितां व (एरवींहि त्यांस) उत्तम आहार (समजून अनेक
प्रकारें उपयोगांत आणतां). जे लोक अक्कल राखतात त्यांच्यासाठीं
या(पदार्थां)तहि (ईश्वरसामर्थ्याची एक मोठी) निशाणी होय यांत
शंका नाहीं. ६७. आणि (हे पैगंबरा!) तुझ्या पालनकर्त्यानें
मधमाशी[2](च्या मनां)त अशी प्रेरणा केली कीं पर्वतांतून व झाडांतून

---

(१) मद्यार्क किंवा दारूचें पिणें निषिद्ध आहे. पण असें असतांहि त्यांत ईश्वरी सामर्थ्य दिसून येतें; कीं द्राक्षें शुद्ध व अनिषिद्ध होत व त्यांचें खाणें कोणताहि वाईट परिणाम उत्पन्न करीत नाहीं. परंतु त्यांच्या कुजल्या सडल्यानें त्यांत ईश्वर प्रतापानें एक कैफ पैदा होतो व त्यामुळें मनुष्याची अक्कल लय पावून जाते. ह्मणूनच कुराणांत दारूचा निषेध केलेला आहे.

(२) मधमाशांचा अहवाल कांहीं चमत्कारिकच आहे. त्यांच्या मोहोळांतील खोल्या भूमिति शास्त्रानुसार बनलेल्या दिसून येतात; अशा कीं लहानाहून लहान जागेंत अधिकांत अधिक मध सांठवितां येतो. मधपोळ्यांत जणुं एका राष्ट्राची व्यवस्था आढळून येते. या माशांची एक राणी असते व मोहोळांतील सर्व माशा तिच्या आज्ञेंत असतात. माशांतही निरनिराळ्या प्रकारच्या माशा असतात. कांहीं मध गोळा करणाऱ्या, कांहीं पाहरा देणाऱ्या, वगैरे. रानटी लोक आपल्या मुलांच्या हुंड्यांत मधपोळे देतात. जें पोळें द्यावयाचें असेल त्यांतील राणीला धरून हवालीं केलें ह्मणजे सर्व माशा तिच्या बरोबर जातात. मधमाशा वसंत ऋतूंत मध गोळा करतात

**व लोक जे उंच उंच तट उभारतात त्यांतून, तूं मोहोळें बनीव; ६८. नंतर हरेक तऱ्हेच्या फळांतून (त्यांचा अर्क) शोषीत फिर; मग तूं (मौजेनें) आपल्या पालनकर्त्याच्या (आंखून दिलेल्या) सुगम मार्गांवर नीट चालली जा. या(माशां)च्या पोटांतून एक पेय निघतें (म्हणजे मध); त्याचे रंग वेगवेगळाले असतात. (आणि) त्यांत लोकां(च्या बहुतेक रोगां)चा परिहार होय. निःसंशय, मनन करणाऱ्या-लोकांसाठीं यांतहि (ईश्वरी सामर्थ्याची एक मोठी) निशाणी होय. ६९. आणि (लोकांनों!) परमेश्वरानेंच तुह्मांस निर्मिलें; मग तोच तुमचे प्राण हरण करितो. आणि तुमच्यांतून कित्येक असेहि होत कीं जे आयुष्याच्या (सर्वांत) खडतर(अवस्थे)कडे पालटले जातात; अशासाठीं कीं (बहुत कांहीं) जाणल्या(बुजल्या)नंतर (असे साठळलेले होऊन जावेत कीं) त्यांना कांहींच जाणतां येऊं नये.**

---

व शरदृतुसाठीं त्याचा संचय करून ठेवतात. त्यांना जेव्हां पोळें सोडावयाचें असतें तेव्हां त्या शिलक उरलेला मध सारा चाटून जातात. तात्पर्य, ह्या माशांत ईश्वरी सामर्थ्याचे बरेच चमत्कार होत. ज्या रीतीनें माशा मध गोळा करतात व त्याचे संरक्षण करतात, त्यामुळेंच त्यांच्यासंबंधानें ह्मटलें आहे कीं परमेश्वरानें त्यांच्या मनांत अशी अशी प्रेरणा केली आहे.

(१) मध हें एक उत्तम औषध असून कफनाशक आहे व बहुतेक औषधांचें हें अनुपानहि आहे. हजरत **मोहंमद** पैगंबरांचे वेळीं कोणा एका मनुष्याचा भाऊ पोटांतील भयंकर व्याधीनें पिडीत होता. त्यानें पैगंबरांला विचारिल्यावरून त्यांनीं सांगितलें कीं त्याला मध चाटीव. त्यानें तसें केलें. पण पोटाच्या वेदना कमी होईनात. पुन्हां विचारल्यावरून पैगंबर साहेबांनीं उत्तर दिलें कीं जा, त्याला आण-खीहि मध दे; कारण कीं परमेश्वर सत्यवादी होय व तुझ्या भावाचें पोट लबाड आहे. त्या मनुष्याला पुन्हां जास्त मध देतांच तो ईश्वर-कृपेनें बरा झाला.

(२) या ठिकाणीं मनुष्याच्या शेवटच्या स्थितीचें वर्णन आहे कीं जेव्हां तो ह्यातारा होऊन साठळून जातो तेव्हां तो मुलांसारख्या गोष्टी करूं लागतो.

निःसंशय परमेश्वरच (सर्व कांहीं) जाणता (व) समर्थ होय. ७०. आणि परमेश्वरानेंच तुमच्यांतून कित्येकांस कित्येकांवर अन्न संपत्तींत श्रेष्ठत्व दिलें आहे. तर ज्यांना जास्त (संपत्ति) दिली गेली आहे, ते आपली संपत्ति उलटून, आपल्या उजव्या हातास ज्यांचें स्वामित्व प्राप्त आहे अशा (दास दासीं)स देत नसतात, कीं अन्न संपत्तींत या(सर्वां)चा हिस्सा बरोबर होईल. तर कां हे लोक परमेश्वराच्या देणग्यांस नाकारितात? ७१. आणि तुमच्यांतूनच परमेश्वरानें तुह्मांप्रीत्यर्थ बायका निर्माण केल्या; आणि (अशाच तऱ्हेनें) तुमच्या बायकांपासून तुह्मांसाठीं पुत्र व पौत्र हे निर्माण केले व तुह्मांस चांगले (चांगले) पदार्थ खावयास दिले. तर कां (हे लोक अगदींच) मिथ्या(उपास्यांच्या अन्नदाते होण्या)चा विश्वास धरतात; आणि परमेश्वराच्या देणग्याप्रत कृतघ्नता दर्शवितात? (आणि वास्तविक पाहतां खरा दाता तोच होय.) ७२. आणि परमेश्वरा-

(१) भावार्थ असा दिसून येतो कीं इहलोकींची व्यवस्था परस्पर स्थित्यंतरावर अवलंबून आहे. जर सर्व मनुष्यें सर्व गोष्टींत सारखीं असतील, तर मग कोणी राजा कां व कोणी प्रजा कां, कोणी गरजवंत कां व कोणी गरज भागविणारा कां, कोणी बहु पुत्रवान कां व कोणी निःपुत्रिक कां, आणि कोणी घरधनी कां व कोणी भाडेकरी कां? परंतु ज्याप्रमाणें हे स्थित्यंतर परमेश्वराचें निर्माण केल्यानें होतें त्याचप्रमाणें या स्थित्यंतरानें जगांत कायम राखणें हेंहि परमेश्वराचे व्यवस्थेनेंच होतें. तात्पर्य, चोर, ठग, भामटे व लोकांचा हक्क बळकावून बसणारे, हे लोक हाच कायदा मोडूं पाहतात कीं जेणेकरून सार्वजनिक शांततेचा भंग होतो. तर जगांत शांतता जी कायम होय ती, हें स्थित्यंतर जी आपल्या स्वतंत्र अधिकाराची गोष्ट नव्हे ती चालू राहते म्हणूनच होय. एवंच ही एक ईश्वरानें दिलेली देणगी होय. म्हणून अशा स्वतंत्र देणगी देणारास, तें तूं त्याला कां दिलेंस व मला कां दिलें नाहींस असा प्रश्न करणें चुकीचें होय; व तें निरीश्वर–वादानें घातक होय. कारण माणसानें आपल्या अखत्यारानें हें स्थित्यंतर उत्पन्न केलें नाहीं व तो आपल्या अधिकारानें तें कायमहि राखूं शकत नाहीं. तर मग परमेश्वराची देणगी तर मान्य पण त्या देणगीचा दाता मान्य नाहीं हें कसें बरें होऊं शकतें?

शिवाय ते अशा (देवां)ची उपासना करतात कीं जे आकाश व पृथ्वी यांतून यांना अन्न-संपत्ति देण्याची कांहींच सत्ता ठेवीत नाहींत; आणि (अशी सत्ता) त्यांना शक्यहि नाहीं. ७३. तर (इहलोकिक राजांच्या अनुमानावर) परमेश्वराप्रीत्यर्थ उपमा घडूं नका; (योग्य उपमा देणें हें) परमेश्वराला माहीत आहे व (तें) तुह्मांस माहीत नाहीं. ७४. परमेश्वर एक दृष्टांत सांगतो आहे कीं एक दास होय दुसऱ्याच्या मालकीचा, कीं तो कोणत्याहि गोष्टीवर सत्ता ठेवीत नाहीं; आणि एक (दुसरा) मनुष्य होय (स्वतंत्र), कीं त्याला आह्मीं आपल्याकडून चांगली (मुबलक) संपत्ति देऊन ठेविली आहे; तर तो तींतून

(१) अनेकदेववादी व मूर्तिपूजक हे अनेक देव मानण्याचा असा अर्थ करीत होते व आतांहि करतात कीं जसे राजांपाशीं मुद्दमुखत्यार व स्वतंत्र वजीर व कामदार असतात तसेंच परमेश्वराच्या दरबारांत आमचे इतर उपास्य देवहि होत. परमेश्वरानें त्यांची ही उपमा खोटी पाडिली कीं तुह्मांस योग्य उपमा देतां येत नाहीं; तुमच्या उपमा अगदींच निराधार व बुद्धि रहीत असतात. म्हणून परमेश्वरानें स्वतः दोन उपमा पुढें दिल्या आहेत व त्या कारण प्रमित व न्याय्य अशा होत. 'परमेश्वराला माहीत आहे व (तें) तुह्मांस माहीत नाहीं.' याचा हा अर्थहि होऊं शकतो कीं परमेश्वर लोकांच्या स्थितीशीं वाकब आहे व तुह्मीं मानव वाकब नाहींत. ही वाकबगारी नसल्या मुळेंच तुमच्यांत जे राजे असतात त्यांस साक्ष घ्यावें लागतें आणि जे गरजवंत होत त्यांनाहि ह्याची आवश्यकता भासते कीं कोणी त्यांना शिफारसकर्ता वा मध्यस्थी असावा व राजापावेतों त्यांची बातमी पोहोंचवावी. परंतु याच्या उलट परमेश्वर स्वतः सर्वज्ञानी व दूरदर्शी होय. तो कसल्याहि साधनां-वाचून तुमचें ऐकतो व तुमची सर्व स्थिति जाणतो आहे.

(२) या दृष्टांतांत, मूर्ती व इतर खोटे कल्पित उपास्य देव यांस परतंत्र दास कीं जे आपल्या सत्तेनें कांहींच करूं शकत नाहींत ते, ठरविले आहेत. आणि परमेश्वरानें आपली उपमा अशा स्वतंत्र इस-माशीं दिली आहे कीं जो आपल्या मालमत्तेत हवी तशी उलाढाल करूं शकतो व जो कोणच्याही अंकित नसतो.

गपचीप (गपचीप) व जगजाहीरपणें (जसा हवा तसा) खर्च करितो. (तर) कां (असलीं दोन मनुष्यें) सारखीं होऊं शकतात? (हा दृष्टांत ऐकून मूर्तीपूजक अवश्य बोलूं लागतील कीं ते लोक सारखे होऊं शकत नाहींत; तर हे पैगंबरा! तूं यांना सांग,) सर्व स्तुति परमेश्वरालाच (योग्य) होय (कीं तुह्मांस इतकी समज तर आहे)! परंतु (या लोकांची स्थिति ही होय कीं) यांच्यांत बहुतेक (इतकेंहीं) समजत नाहींत. ७५. आणि परमेश्वर (एक दुसरा) दृष्टांत सांगतो आहे (कीं) दोन पुरुष (होत), त्यांच्यांतून एक (जन्माचा) मुका (व मुका असूनहि परतंत्र कीं स्वतः) कांहींच करावयास समर्थ नाहीं, आणि (मुका असल्यामुळें) तो आपल्या मालकाला भारच होय, कीं जेथें कोठें तो त्याला धाडील तेथें त्याला कांहींच श्रेय (प्राप्त) होत नाहीं. तर कां असा (परतंत्र दास) व जो मनुष्य (लोकांस) मध्यम मार्गावर कायम राहण्यास सांगतो व स्वतःहि (मध्यम ह्मणजे न्यायाच्या) सरळ मार्गावर (कायम) होय तो, हे दोन्हीं बरोबर होऊं शकतात? ७६. आणि आकाश व पृथ्वीच्या गुप्त गोष्टी परमेश्वरालाच (माहीत) होत. आणि (पुनरुत्थानाच्या) घटकेची घडामोड तर केवळ अशी होय कीं जसें डोळयांचें लवणें; किंबहुना ती (याहूनहि) शिघ्रतर होय. निःसंशय परमेश्वर सर्वशक्तिमान् होय. ७७. आणि (लोकांनों!) परमेश्वरानेंच तुह्मांला तुमच्या

---

(१) हा दुसरा दृष्टांतहि पहिल्याप्रमाणेंच मूर्तींचा होय कीं त्या केवळ परतंत्र व अधिकाररहित असे गुलाम होत; याशिवाय त्या मूर्ती जसे जन्माचे मुके असतात तशा मुक्या व बुद्धिशून्य होत. धनी अशा गुलामांस ज्या ज्या कामांस धाडून देतो त्यांच्यानें तीं कामें रेटत नाहींत व त्यांत त्यांना यशहि येत नाहीं. आणि दुसऱ्या बाजूस परमेश्वराची अशी उपमा आहे कीं त्यांत परमेश्वरानें आपणास असा एक मनुष्य प्रगट केला आहे कीं जो सरळ मार्ग दाखवितो व आपणहि सरळ मार्गावर होय. आणि सरळ मार्ग दाखविण्यासाठीं मोठें वक्तृत्व व बुद्धिकौशल्य पाहिजे असतें तें या मुक्या व बुद्धिशून्य मूर्तींत नसतें.

आईच्या पोटांतून काढिलें (व त्यावेळीं) तुह्मीं कांहींच जाणते नव्हतां; आणि त्यानें तुह्मांस कान दिले व डोळे (दिले) व हृदयें (दिलीं) कीं कदाचित तुह्मीं (त्याचे) आभार मानाल. ७८. कां लोकांनीं पक्ष्यां(च्या स्थिती)चें अवलोकन केलें नाहीं कीं ते खुल्या अंतरिक्षांत वश होऊन राहिलेले असतात (कीं त्यांतून बाहेर जाऊं शकत नाहींत); त्यांना (उडतांना) मात्र परमेश्वरच सावरून धरतो. जे लोक विश्वास ठेवितात त्यांच्यासाठीं ह्यांत (ईश्वर-सामर्थ्याच्या बऱ्याच) निशाण्या होत. ७९. आणि परमेश्वरानेंच तुह्मांप्रीत्यर्थ तुमच्या घरांस राहण्याचें ठिकाण बनविलें व गुरांढोरांच्या कातड्यांतून तुह्मांसाठीं (तंबू, वगैरे एका विशिष्ट प्रकारचीं) घरें बनविलीं; कीं त्यांस तुह्मीं आपल्या कूच करण्याचे दिवशीं व आपल्या मुक्काम करण्याचे दिवशीं हलकींफूल पावतां; आणि चतुष्पाद जनावरांची लोकर व त्यांची लंव व त्यांचे केंस यांतून (तुमचें) बहुतेक सामानसुमान व उपयुक्त सटरफटर बनविलें (कीं तुह्मीं) अमुक एका वेळेपर्यंत (त्यांचा सुखोपभोग घ्यावा.) ८०. आणि परमेश्वरानेंच तुह्मांसाठीं, आपण सृष्ट केलेल्या वस्तूंच्या सावल्या बनविल्या आणि पर्वतांतून तुमच्यासाठीं (गुहा गुफा वगैरे) एकांताचीं स्थानें बनविलीं; आणि त्यानें तुह्मांसाठीं वस्त्रप्रावरण बनविलें कीं तें तुमचें गरमी(-सरदी)पासून रक्षण करील व (कांहीं लोहमय) वस्त्रें (म्हणजे चिलखतें बनविलीं) कीं तीं तुह्मांस तुमच्या (परस्पर) प्रहारापासून वांचवितील. अशा प्रकारें (परमेश्वर) आपल्या देणग्या तुह्मां लोकांवर परिपूर्ण करितो, कीं कदाचित् तुह्मीं (उपकार मानून त्याच्या) आज्ञाधीन होऊन जाल. ८१. मग जर (लोक इतक्या समजाविल्यावरहि) तोंड चुकवितील, तर (हे पैगंबरा!) तुजकडे (परमेश्वराच्या आज्ञा) स्पष्टपणें पोहोंचविणें होय एवढेंच काय तें. ८२. (हे लोक) परमेश्वराच्या देणग्या ओळखतात व मग (जाणून बुजून)

(१) भावार्थ हा कीं तुह्मीं जन्मताच निव्वळ ज्ञानहीन व बुद्धिशून्य होतां. तर यावरून उघड दिसून येतें कीं तुह्मी आपल्या इच्छेनें पैदा झालां नाहीं.

त्या नाकारितात; आणि यांच्यांतून बहुतेक अनुपकारी होत. ८३. आणि (लोकांनों! पुनरुत्थानाच्या दिवसाची आठवण करा कीं) त्या दिवशीं आह्मीं हरेक जनतेंतून (त्या जनतेच्या पैगंबरास) साक्षी (बनवून) उभा करूं; मग नास्तिकांस (आहि काढण्याची) परवानगी दिली जाणार नाहीं व त्यांना माफीहि दिली जाणार नाहीं. ८४. आणि ज्या लोकांनीं (परमेश्वराच्या संबंधांत) दांडगाई केली आहे ते, जेव्हां (पुनरुत्थानाचे दिवशीं) शिक्षा पाहून घेतील तेव्हां (कांहीं केलें तरी) त्यांच्यावरून तर (शिक्षाच) हलकी केली जाणार नाहीं व त्यांना अवकाशहि दिला जाणार नाहीं. ८५. आणि जे लोक (जगांत परमेश्वराचे) सरकतदार स्थापित राहिले ते जेव्हां (पुनरुत्थानाचे दिवशीं) आपल्या (त्या) सरकतदारांना पाहतील, तेव्हां (त्यांना पाहतांच ) ते बोलूं लागतील कीं हे आमच्या पालनकर्त्या! ज्यांना आह्मीं तुझ्याशिवाय (जगांत कर्ताहर्ता समजून) बोलावीत होतों ते आमचे सरकतदार हेच होत. मग ते सरकतदार (त्यांचें) बोलणें (उलटें) त्यांच्याचकडे फेंकून मारतील कीं अर्थात तुह्मीं (नखशिखांत) लबाड आहां. ८६. आणि ते लोक त्यादिवशीं परमेश्वरासमोर इस्लाम–आज्ञाधीनता पुढें करतील आणि (जगांत) ते जें जें कुभांड रचीत होते तें (सर्व) त्यांच्यापासून नाहींसें होऊन जाईल. ८७. जे लोक नास्तिकपणा करीत व (लोकांस) परमेश्वराचे मार्गाहून अडकवित राहिले ते, जो (हा) फिसाद करीत राहिले त्याच्या शासनार्थ आह्मीं त्यांच्याठायीं शिक्षेवर शिक्षाच वाढवीत जाऊं. ८८. आणि (लोकांनों! पुनरुत्थानाचे दिवसाची आठवण करा कीं) त्यादिवशीं आह्मीं हरेक जनतेंत त्यांच्यांतलाच एक साक्षी (ह्मणजे पैगंबर) त्यांच्यावर

(१) अपराध्यासाठीं हेंहि एक प्रकारचें शासन होय; कीं त्याच्यापासून जबाबहि घेतला जाऊं नये. या जगांत कोणी अधिकारी असें करील तर तो अन्याय होय. पण सर्वज्ञानी परमेश्वरास जाब घेण्याचीहि जरूरीच काय पडणार, तो तर जबाब घेतल्यावांचूनहि सर्व कांहीं जाणतोच आहे.

उभा करूं; आणि (हे पैगंबरा!) तुला (तुझ्या काळच्या) ह्या(नास्तिकां) वर साक्षी बनवून आणूं. आणि (हे पैगंबरा!) आह्मीं तुला (हें) पुस्तक प्रकट केलें आहे, (कीं ज्यांत) हरेक गोष्टींचें (समर्पक) विवेचन (होय), आणि मुसलमानांप्रीत्यर्थ सद्बोध व दया व शुभवर्तमान (हीं होत). ८९. (मुसलमानांनों!) परमेश्वर न्याय करण्याचा हुकूम देतो व (लोकांशीं) परोपकार करण्याचा आणि आप्त नातलगांस (द्रव्य संबंधीं साहाय्य) देण्याचा; आणि निर्लज्जपणा(चीं कामें) व असंभावित वर्तणूक आणि (एकमेकांवर) अत्याचार करणें यांपासून मनाई करतो. तो तुह्मांस (असे असे) बोध करितो कीं कदाचित् तुह्मीं (या गोष्टींचें) मनन कराल. ९०. आणि जेव्हां तुह्मीं लोक आपसांत कौलकरार करून टाकाल, तेव्हां परमेश्वराचा करार पुरा करा; आणि शपथां पक्क्या केल्या पश्चात त्या मोडून टाकूं नका; आणि वास्तविक पाहतां तुह्मीं परमेश्वराला आपला जामिन ठरवून चुकलां आहां. कांहीं संशय नाहीं कीं जें कांहीं तुह्मीं करीत राहिलां आहां, तें परमेश्वर खूप जाणून आहे. ९१. आणि (शपथा मोडण्यांत) तुह्मीं त्या स्त्री सारखे होऊन जाऊं नका कीं जिणें आपलें कांतलेलें सूत मजबूत पीळ दिल्यानंतर तुकडे तुकडे करून तोडून टाकिलें; कीं तुह्मींहि आपल्या शपथांस (ह्या मुळें) आपसांतील फिसादाचें कारण बनवूं लागावें कीं एक जनसमूह हा दुसऱ्या जनसमूहापेक्षां जबरदस्त होय. परमेश्वर (ज्यानें कित्येकांस जबरदस्त व कित्येकांस कमजोर बनवून ठेविलें आहे तो) केवळ या(स्थित्यंतरा)द्वारें तुह्मां लोकांस कसून

(१) या प्रकारचा मजकूर कुराणांत इतरत्रहि आला आहे. भावार्थ असा कीं ज्यावेळीं कर्मांचा हिशेब होऊं लागेल त्यावेळीं एका एका जनतेला त्यांच्या पैगंबरासह पुढें केलें जाईल; आणि पैगंबर साक्ष देतील कीं आह्मीं या लोकांस परमेश्वराचा हुकूम ऐकविला व समजाविला होता.

(२) लोकांत जो आपसांत कौलकरार होतो त्यांत बहुतकरून शपथाशपथ होत असते ह्मणून ह्मटलें कीं शपथा पक्क्या झाल्यावर त्या मोडूं नका ह्मणजे आपले कौलकरार पुरे करा.

